**अल्पसंख्याक बहुल क्षेत्रामध्ये अल्पसंख्याक महिलांसाठी राबविण्यात येत असलेल्या बचत गट योजनेसाठी अनुदान वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बियुडी- २०१४/प्र.क्र.१०८/का-९**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : १२ /०१/२०१५

<u>संदर्भ</u>- १) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र. अविवि-२००९/प्र.क्र.१४/का.९, दि. २८/२/२०१२.
२) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र. अविवि-२००९/प्र.क्र.१४/का.९, दि. १/३/२०१४.
३) माविम/पिएमडी/२०१४/८६१ महाव्यवस्थापक (वित्त व प्रशासन) महिला आर्थिक विकास महामंडळ, यांचे दि. २७/०८/२०१४ चे पत्र

**<u>शासन निर्णय :-</u>**

राज्यातील अल्पसंख्याक बहुल क्षेत्रात वास्तव्यास असलेल्या अल्पसंख्याक लोकसमूहातील महिलांच्या आर्थिक सक्षमीकरणासाठी त्यांना संघटीत करून पुरेसा पतपुरवठा उपलब्ध करून देणे व त्यांना उद्योजलकतेविषयक आवश्यक असलेली माहिती देऊन त्यांच्यामध्ये उद्योजकीय कौशल्ये विकसित करण्याच्या हेतून संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयाद्वारे अल्पसंख्याक लोकसमूहातील महिलांचे स्वयंसहाय्यता गट स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. या अंतर्गत पहिल्या टप्प्यात मुबई शहर, मुबई उपनगर, नांदेड, मालेगांव, कारंजा, परभणी, पुणे, नागपूर, औरंगाबाद, भिवंडी, मुंब्रा-कौसा आणि मिरज येथे अल्पसंख्याक लोक समुहातील महिलांचे स्वयंसहाय्यता बचत गट स्थापन करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत अल्पसंख्याक महिलांचे २४०० बचत गट निर्माण करून त्यांचे १३ लोकसंचलित साधन केंद्र ८ वर्षाच्या कालावधीत उभी राहणार आहेत. या करीता रु. २७, ५४, ३२, ६३९ /-(सत्ताविस कोटी चोपन्न लाख बत्तीस हजार सहाशे एकोणचाळीस फक्त ) इतक्या अपेक्षित खर्चास दि.१/३/२०१४ च्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. ही योजना महिला आर्थिक विकास महामंडळामार्फत राबविण्यात येत आहे.

२. महिला आर्थिक विकास महामंडळाला यापुर्वी दि.३१.३.२००९ रोजीच्या शासन ज्ञापनान्वये या प्रयोजनार्थ वाटप करण्यात आलेला रु.३,२०,००,०००/-इतका निधी खर्च झाला आहे.

३. सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात या प्रयोजनासाठी रु. १.८ कोटी निधी मंजूर आहे. सदर निधीच्या ६०% म्हणजेच रू. १.०८ कोटी इतका निधी धनादेशाव्दारे महिला आर्थिक विकास महामंडळाला वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र महिला आर्थिक विकास महामंडळाने शासनास सादर करणे आवश्यक राहील. प्रस्तुत प्रकरणी सदर रक्कम आहरीत करण्यासाठी अवर सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग नियंत्रण अधिकारी तथा आहरण व संवितरण अधिकारी राहतील.

४. यासाठी होणारा खर्च सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरीता मागणी क्र. झेडई-१, २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, २०० इतर कार्यक्रम, (०१) स्वयंसहायता गटाकरीता सहायक अनुदान (२२३५ ए १६९), ३१ सहायक अनुदान या लेखाशीर्षाखाली मंजूर असलेल्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

५. महिला आर्थिक विकास महामंडळामार्फत याबाबतचे वर्षनिहाय खर्चाचा लेखाविषयक तपशिल ठेवावा, ज्या बाबींसाठी अनुदान वितरीत करण्यात आले आहे त्याबाबींवरच खर्च करण्यात यावे. सदर बाबींचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे बंधनकारक राहील. अल्पसंख्याक विकास विभागाचे अधिकारी स्वयंसहायता बचत गटास भेट देतील.

६. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.९८४/१४/व्यय-४, दि. १०.११.२०१४ अन्वये मिळालेल्या मान्यतेस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०११२१४४५२४६३१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

GANGURDE SANJAY SURYAKANT

Digitally signed by GANGURDE SANJAY SURYAKANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT,CID - 919995, postalCode=400032, st=Maharashtra, cn=GANGURDE SANJAY SURYAKANT
Date: 2015.01.12 14:55:15 +05'30'

**(सं.सु.गांगुर्डे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
२) महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
३) संचालक, लेखा व कोषागारे
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
५) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
६) महिला आर्थिक विकास महामंडळ, गृहनिर्माण भवन, कलानगर, बांद्रा (पूर्व) मुंबई,
७) सर्व विभागीय आयुक्त,
८) सर्व जिल्हाधिकारी,
९) अल्पसंख्याक विकास विभाग का. ७ मत्रालय मुबई
१०) उप सचिव, वित्त विभाग (व्यय-४), अर्थ-१४ नियोजन विभाग (का-१४७५) मंत्रालय, मुंबई,
११) निवडनस्ती (कार्यासन-९)